**विरार ते अलिबाग बहुद्देशिय वाहतूक मार्गिका (VAMMC) या प्रकल्पाच्या भूसंपादनासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडून उभारण्यात येणाऱ्या रु.२२,२५० कोटीच्या (अक्षरी रु.बावीस हजार दोनशे पन्नास कोटी फक्त) कर्ज रकमेस शासन हमी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग,**
**शासन निर्णय क्रमांकः- शाहमी-२०२५/सा.बां वि/प्र.क्र .५५/अर्थबळ**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- १२/०६/२०२५

**वाचा :** १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. शासन हमी-१०९९/प्र.क्र.६८/शासन हमी, दि ५/११/१९९९.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.शाहमी १००८/प्र.क्र.१८/ शासन हमी, दि. २८/४/२००८.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.शाहमी १०२४/प्र.क्र.५८/अर्थबळ, दि.३०/९/२०२४.

**प्रस्तावना-**

विरार ते अलिबाग बहुद्देशिय वाहतूक मार्गिका (VAMMC) या प्रकल्पाच्या भूसंपादनासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाला हुडको या वित्तीय संस्थेकडून उभारण्यात येणाऱ्या रु.२२,२५०.०० कोटीच्या कर्ज रकमेस वित्त विभागाच्या अटीस अधीन राहून शासन हमी देण्याच्या प्रस्तावास मा.मंत्रिमंडळाने दि.२६.६.२०२४ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत मंजूरी दिली आहे. त्यानुषंगाने आता, सार्वजनिक बांधकाम विभागाने केलेल्या विनंतीनुसार, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास हुडको या वित्तीय संस्थेकडून रु.२२,२५० कोटी इतक्या रकमेचे कर्ज उभारण्यास शासन हमी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विरार ते अलिबाग बहुद्देशिय वाहतूक मार्गिका (VAMMC) या प्रकल्पाच्या भूसंपादनासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाला हुडको या वित्तीय संस्थेकडून रु.२२,२५० कोटी (रुपये बावीस हजार दोनशे पन्नास कोटी फक्त) रकमेचे कर्ज उभारणीकरिता खालील अटीच्या अधिन राहून शासन हमी मंजूर करण्यात येत आहे -

(१.१) विरार ते अलिबाग बहुद्देशिय वाहतूक मार्गिका (VAMMC) या प्रकल्पाच्या भूसंपादनासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाला हुडको या वित्तीय संस्थेकडून रु.२२,२५० कोटी (रुपये बावीस हजार दोनशे पन्नास कोटी फक्त) रकमेचे कर्ज उभारण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(१.२) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाच्या मागणीनुसार हुडकोकडून प्रस्तावित व्याजाचा दर कर्ज घेण्याच्या वास्तविक दिनांकावर अवलंबून असणार आहे. कर्ज घेताना रिझर्व्ह बँकेच्या प्रचलित बँक दराचा विचार करुन, त्यानुसार व्याजाचा दर कमीत कमी निश्चित करण्याबाबतची कार्यवाही करावी.

(१.३) सदर मुदत कर्जाचा कालावधी १५ वर्षाचा राहील.

(१.४) विधि व न्याय विभागाने विहित केलेल्या नमुन्यात शासन हमी करारनामा करण्यात यावा.

(१.५) हुडकोकडून महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने घेतेलेल्या कर्जाची परतफेड करण्यास विलंब झाल्यास, त्याकरीता आकारण्यात आलेल्या दंडनीय व्याजाकरीता व इतर कोणत्याही देय रक्कमांसाठी शासन हमी लागू राहणार नाही.

(१.६) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडून कर्जाच्या परतफेडीबाबत अथवा व्याजाची रक्कम देण्याबाबत होणाऱ्या कसुरीची सूचना शासनास ९० दिवसाच्या आत देणे हुडको या वित्तीय संस्थेस बंधनकारक राहील.

(१.७) हुडको ही संस्था राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास या आदेशामध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक कर्ज देणार नाही. तसेच, सदर प्रयोजनासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ अन्य कोणत्याही संस्थेकडून कर्ज घेणार नाही.

(१.८) उपरोक्त अटींचा भंग झाल्यास, शासन हमी अवैध होईल.

२. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाला रु.२२,२५० कोटीची शासन हमी संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहील.

(२.१) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई हे Principal Debtor राहतील .

(२.२) सदरचे कर्ज (मुद्दल व व्याज) फेडण्याची संपूर्ण जबाबदारी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई यांची राहील. यात कसूर केल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी महामंडळाची राहील.

(२.३) सदर शासन हमीवर देण्यात आलेले कर्जाचे दायित्व राज्य शासनावर येणार नाही याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाने दक्षता घ्यावी.

(२.४) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने दर महिन्याला कर्ज परतफेडीच्या प्रगतीबाबतची स्थिती दर्शविणारी माहिती सार्वजनिक बांधकाम विभाग/वित्त विभागाकडे सादर करावी.

(२.५) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने विहित कार्यपध्दतीने लेखापरीक्षीत केलेल्या लेख्याची एक प्रत शासनास सादर करावी.

(२.६) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ त्यांच्या आर्थिक स्थितीबाबतचा अहवाल शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्र अ मध्ये दर ६ महिन्यांनी (३१ मार्च व ३० सप्टेंबर) सार्वजनिक बांधकाम विभागाला सादर करेल.

३. <u>हमी शुल्क</u> -

(३.१) वित्त विभाग, शासन निर्णय, दि.३०.९.२०२४ नुसार प्रस्तुत प्रकरणी शासन हमी शुल्क द.सा.द.शे.रु.०.५० इतके राहील.

(३.२) हमीशुल्क ज्या कालावधीकरीता देय राहील त्या कालावधीतील कोणत्याही दिवशी कमाल अदत्त असलेल्या कर्ज आणि व्याजाच्या एकूण रकमेवर (total maximum outstanding amount)देय राहील.

हमीशुल्काच्या परिगणनेसाठी, महिन्यातील १५ दिवसापेक्षा कमी दिवस वगळण्यात यावेत आणि १५ दिवस किंवा त्यापेक्षा अधिक दिवसांचा कालावधी पूर्ण महिना म्हणून धरण्यात यावा. हमी मंजूर केलेल्या शासन निर्णयाचा दिनांक आणि कर्जाची प्रत्यक्ष उभारणी यामध्ये मंदन अवधी (Time Lag) असला तरी हमीशुल्क, हमी दिल्याच्या दिनांकापासून उपरोक्त कार्यपध्दतीनुसार भरावे.

(३.३) हमी शुल्काचा भरणा दर सहा महिन्यानी करण्यास व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई हे जबाबदार असतील. प्रत्येक वित्तिय वर्षाच्या ३१ मार्च आणि / अथवा ३० सप्टेंबर रोजी अदत्त असलेल्या घटना सापेक्ष दायित्वावर (Contingent Liability) देय असलेल्या हमी शुल्काचा भरणा १ एप्रिल आणि / अथवा १ ऑक्टोबर रोजी करण्यात यावा.

(३.४) देय हमी शुल्काचा भरणा केल्यानंतर त्यामधून प्रथम चक्रीत हमी शुल्कावरील दंडनीय व्याजाची रक्कम वळती करुन घेण्यात येईल. नंतर सर्वात जुन्या थकीत हमी शुल्काची वसुली, त्यानंतर त्यापेक्षा कमी जुन्या हमीशुल्काची वसुली याप्रमाणे रक्कम वळती करुन घेण्यात येईल.

(३.५) देय हमी शुल्क शासन तिजोरीत भरणा करण्यास महामंडळाकडून कसूर झाल्यास अशा कसूर केलेल्या थकीत रक्कमेवर पहिल्या तीन महिन्यासाठी १६ टक्के दराने व त्या पुढील कालावधीसाठी २४ टक्के दराने व्याज आकारले जाईल.

(३.६) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई यांनी शासन हमी शुल्काची रक्कम "८२३५-सर्वसाधारण व इतर राखीव निधी, ११७-हमी विमोचन निधी (८२३५५०४५०१)" या लेखाशिर्षाखाली शासकीय कोषागारात भरणा करावी. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाकडून देय असलेली हमी शुल्काची रक्कम शासकीय कोषागारात नियमितपणे भरणा केली जाते याबाबतच्या संनियंत्रणाची जबाबदारी उप सचिव, (रस्ते-८), सार्वजनिक बांधकाम विभाग यांची राहील.

(३.७) हमी शुल्क भरल्याच्या पृष्ठयर्थ चलनाची सांक्षाकित प्रत सार्वजनिक बांधकाम विभागाने वित्त विभागास सापेक्षाने पाठवावी.

(३.८) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई यांनी देय हमीशुल्काचा भरणा केला नाही तर सदर हमीशुल्क सार्वजनिक बांधकाम विभाग त्या महामंडळास देय असणा-या अनुदानातून वळती करुन शासनाकडे भरणा करेल किंवा महामंडळाकडून वसूल करेल.

(३.९) महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई यांच्याकडून सदर कर्ज परतफेडीसाठी सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय संबंधित संस्थेला हमी पूर्ततेकरीता शासन हमीची प्रतिपूर्ती म्हणून वापर करता येणार नाही. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई यांची चल अचल मालमत्तेची विक्री / लिलाव (Auction) करुन, वसुलीचा निर्णय झाल्यास, त्यावेळी एक समिती स्थापन करावी व त्या समितीमध्ये महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई, सार्वजनिक बांधकाम विभाग व वित्त विभाग यांचा प्रत्येकी एक प्रतिनिधी घेण्यात यावा.

वरील सर्व अटींपैकी कोणत्याही अटीचा भंग झाल्यास शासन हमी अवैध होईल.

४. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई व हुडको यांचेसमवेत कर्ज घेण्यासंबंधी करावयाच्या करारपत्रावर स्वाक्षरी करण्याकरिता सार्वजनिक बांधकाम विभागातील संबंधित उप सचिव व वित्त विभागातील उप सचिव (अर्थबळ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या धारीका क्रमांक- खाक्षेस-२०२४/प्र.क्र.२७९/रस्ते-८ वरील प्रस्ताव व वित्त विभागाच्या शासन हमी क्रमांक ०२/२०२५-२६ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१२१२००४८०८०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SUNIL SHANKAR SHINDE
Date: 2025.06.12 12:01:51 +05'30'

**( सुनिल शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुबई,
४) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६) सर्व सन्माननिय सदस्य विधानपरिषद/ विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई,
७) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव,
८) मा.उप मुख्यमंत्री(वित्त) महोदयांचे प्रधान सचिव,
९) मा.उप मुख्यमंत्री(गृह) महोदयांचे सचिव,
१०) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१२) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर,
१३) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
१४) * सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
१५) सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) मंत्रालयीन सर्व विभाग,
१७) व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मर्या. मुंबई, प्रियदर्शनी पार्क, नेपियनसी रोड, मुंबई-४०० ०३६.
१८) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
१९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२०) वित्त विभाग (व्यय-७/सा.उ./ऋण व हमी संनियंत्रण कक्ष), मंत्रालय, मुंबई.
२१) निवड नस्ती अर्थबळ.